राज्यातील प्रत्येक तालुक्यामध्ये शासकीय
तंत्र माध्यमिक शाळा / केंद्र सुरु करण्यास
मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक व्हीओसी २००९/(६९/०९)/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ ऑगस्ट, २००९

संदर्भ : १) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण
महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ७/शातांवि/आदि.उपयो/२००८/३४,
दि. २३/१/२००८ चे पत्र.
२) शासन निर्णय क्र. व्हीओसी-२००८/(०७/०८)/व्यशि-३, दि. २८/८/२००८
३) शासनाचे क्र.व्हीओसी २००८/(१७३/०८)/व्यशि-३ दिनांक १३ मार्च, २००९ चे पत्र
४) प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण,
महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ७/शातांवि/आदि.उपयो/२००८/३४,
दि. ३/६/२००९ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-** ११ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये व्यवसाय शिक्षणाचा विस्तार व व्याप्ती वाढविण्याबाबत केंद्र शासनाने भर दिलेला आहे. इ. १० वी पर्यंत गळती होणाऱ्या ५० टक्के विद्यार्थ्यांना तांत्रिक कौशल्ये शिकवून त्यांना मुख्य प्रवाहात आणणे हे धोरण ठेवण्यात आलेले आहे. तसेच जे विद्यार्थी माध्यमिकस्तरावर पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम निवडतात ते विद्यार्थी इ. १० वी उत्तीर्ण झाल्यानंतर व्यवसाय किंवा तांत्रिक शिक्षण/ प्रशिक्षणाकडे वळतात असा अनुभव आहे. पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमामुळे या विद्यार्थ्यांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण होते व ते पुढे एच.एस.सी. व्होकेशनल/ + २ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम/ आय.टी.आय., पदविका अभ्यासक्रमाकडे जाऊन पुढे अभियांत्रिकी पदवीपर्यंतही पोहोचतात. पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमामुळे माध्यमिक स्तरावरच त्यांच्या जीवनाला एक दिशा मिळते आणि म्हणून व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रम हा पूर्व माध्यमिक स्तरापासूनच सुरु करण्यात यावा अशीही मागणी अनेकवेळा होत आहे.

सन १९८६ च्या नवीन शैक्षणिक धोरणानुसार शिक्षणाच्या विविध स्तरावर व्यवसाय शिक्षण घेऊन विद्यार्थ्यांना रोजगार व स्वयंरोजगार करण्यास सक्षम करण्याचे उद्दीष्ट ठेवण्यात आले आहे. याअनुषंगाने सन १९९६-९७ पासून शालेय स्तरावर( इ. ८ वी ते १० वी ) बहुकौशल्य युक्त V२ व V३ हे व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात आले आहेत. राज्यामध्ये सध्या १५६ शासकीय, २३५ अशासकीय अनुदानित आणि २१४ अशासकीय विनाअनुदानित संस्थांमध्ये पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम राबविण्यात येत आहे. या अभ्यासक्रमाची एकूण प्रवेशक्षमता ५४,९६० इतकी आहे. माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रमाचे महत्व लक्षात घेऊन या अभ्यासक्रमाची व्याप्ती वाढविणे आवश्यक आहे.

प्रत्येक तालुकास्तरावर शासकीय तांत्रिक माध्यमिक विद्यालय/केंद्र सुरु केल्याने या तांत्रिक विद्यालयामधून इ. ८ वी ते १० वी मध्ये प्रत्येकी १२० प्रमाणे एकूण ३६० विद्यार्थी व्यवसाय शिक्षण घेऊ शकतील. तसेच स्वतंत्र तांत्रिक विद्यालय/ केंद्र सुरु केल्याने त्या केंद्राचा लाभ जवळपासच्या ४ ते ५ शाळेतील विद्यार्थी घेऊ शकतात. सदर अभ्यासक्रम उत्तीर्ण झालेले विद्यार्थी भविष्यामध्ये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षणाशी संबंधित अभ्यासक्रमाचा

अभ्यास करुन रोजगार व स्वयंरोजगार करण्यास सक्षम होऊ शकतात. त्याअनुषंगाने प्रत्येक तालुकास्तरावर शासकीय तांत्रिक माध्यमिक विद्यालय /केंद्र सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** स्वतंत्र शासकीय तांत्रिक विद्यालय सुरु करावयाचे झाल्यास भांडवली खर्च मोठया प्रमाणात होतो. तालुका स्तरावर उपलब्ध शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या परिसरात शासकीय तांत्रिक विद्यालये सुरु केल्यास औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या इमारतीचा महत्तम वापर होईल. तसेच मर्यादित शिक्षक वर्गाची आवश्यकता राहील त्यामुळे सध्या उपलब्ध असलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या इमारतीमध्येच तंत्र शाळा सुरु करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या अनुषंगाने राज्यातील प्रत्येक तालुका स्तरावर शासकीय तांत्रिक विद्यालये टप्याटप्याने सुरु करण्यास या शासन निर्णयान्वये तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

ही योजना जिल्हास्तरीय योजना असल्यामुळे जिल्हा नियोजन व विकास मंडळे जस-जसा निधी उपलब्ध करुन देतील त्यानुसार त्या जिल्हयातील शासकीय तांत्रिक विद्यालय /केंद्र सुरु नसलेल्या तालुक्यात या संस्था सुरु कराव्यात. तालुक्याच्या प्रत्येक ठिकाणी शासकीय तांत्रिक विद्यालय/ केंद्र सुरुवातीस त्या त्याठिकाणच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सुरु करण्यात यावे. तसेच सदर संस्थेच्या मुख्याध्यापकाचे काम सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या प्राचार्यांकडे देण्यात यावे. तसेच आवश्यकतेनुसार इतर आवश्यक असलेल्या पदांची निर्मिती करण्यात येईल.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. २००१०८१८१२४२४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(शोभा वि. पत्की )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई -१
३) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/नागपूर/ अमरावती/लातूर/औरंगाबाद. ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
४) सहसंचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई /नाशिक/ पुणे/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
५) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
६) संबंधित सर्व अशासकीय संस्था ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत, संचालनालयास विनंती करण्यात येते की सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे. )
७) मा. मंत्री (उ व तं. शि.), यांचे खाजगी सचिव
८) मा. राज्यमंत्री (उ व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
९) निवड नस्ती (व्यशि-४)